**राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेकडून आरआयडीएफ-२२ अंतर्गत जलसंपदा विभागाच्या १० प्रकल्पांसाठी रु.५४० कोटींचे कर्ज.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०१७/प्र.क्र.०१/अर्थबळ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१७

वाचा :- महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई यांचे मंजूरी पत्र क्र.एनबी/एसपीडी/६९६२/आरआयडीएफ-२२/१२१ (A)/१६३ पीएससी/२०१६-१७,दिनांक २५/१/२०१७.

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाचे १० प्रकल्प पूर्ण करण्याकरिता राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेने (नाबार्ड) महाराष्ट्र शासनास ग्रामीण पायाभूत विकास निधी टप्पा XXII (आरआयडीएफ-XXII) अंतर्गत वरील वाचा येथे नमूद केलेल्या मंजूरी पत्रान्वये एकूण रु.५४० कोटी (रुपये पाचशे चाळीस कोटी) कर्ज देवू केले आहे. सदर कर्ज योजनेचे स्वरुप थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे:-

(१) सदर कर्ज जलसंपदा विभागाचे १० प्रकल्प दिनांक ३१/०३/२०२० पर्यन्त पूर्ण करण्याकरिता उपलब्ध आहे.

(२) नाबार्डकडून पुढील निदेश दिले जाईपर्यन्त कर्जावरील व्याज ५.२५ टक्के दराने कॅलेंडर वर्षातील दर तीन महिन्याच्या कालावधीनंतर देय आहे.

(३) दिनांक ०१/०४/२०१६ नंतर, ज्या प्रकल्पांकरिता हे कर्ज मंजूर झाले आहे, त्या प्रकल्पांवर प्रत्यक्ष झालेल्या खर्चाच्या आधारे देय असणारी कर्जाची रक्कम नाबार्डकडून मंजूर केली जाईल. प्रत्येक वेळी काढण्यात येणारी (शेवटच्या हप्त्याखेरीज) कर्जाऊ रक्कम ही रुपये एक लक्षच्या पटीत असेल आणि प्रत्येक मागणी ही रु.१० लक्ष पेक्षा कमी असणार नाही.

(४) प्रत्येक वेळी काढण्यात येणारी कर्जाची रक्कम ही कर्ज परतफेडीकरिता स्वतंत्र कर्ज आहे असे समजले जाईल. प्रत्येक वेळी काढण्यात येणा-या कर्जाची परतफेड सात वर्षाच्या आत पाच समान वार्षिक हप्त्यात करावयाची आहे. या सात वर्षाच्या कालावधीमध्ये सुरुवातीचा दोन वर्षाचा सवलतीचा कालावधी (ग्रेस पिरिअेड) समाविष्ट आहे.

(५) नाबार्डच्या मंजूरी आदेशानुसार प्रकल्प पूर्ण करण्याकरिता शासनाचा सहभाग अधिक नाबार्डकडून उपलब्ध होणारे कर्ज अशी एकूण आर्थिक तरतूद प्रथम शासनाकडून केली जाईल. त्यासाठी आवश्यक ती अर्थसंकल्पीय तरतूद विहित वेळेत व विहीत मार्गाने करावयाची दक्षता जलसंपदा विभागाने घ्यावी. प्रत्यक्ष खर्च झाल्यानंतर, नाबार्डकडून मिळणारी कर्जाची रक्कम प्रतिपूर्ती स्वरुपात घेण्यात येईल.

**शासन निर्णय :-**

**(अ)** शासनाने या संदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

(१) नाबार्डने आरआयडीएफ-२२ अंतर्गत जलसंपदा विभागाचे १० प्रकल्प पूर्ण करण्याकरिता मंजूर केलेल्या योजनासाठी रु.५४० कोटी रकमेचे कर्ज शासनाने स्विकारार्ह ठरविले आहे.

(२) नाबार्डने त्यांच्या दिनांक २५/१/२०१७ च्या पत्रात विहित केलेल्या अटी व शर्ती, शासनाने मान्य केलेल्या आहेत, तसेच नाबार्डने केलेल्या सूचनांची नोंद शासनाने घेतली आहे. या कर्ज योजनेकरिता वित्त विभाग समन्वय विभाग म्हणून काम पाहील.

(३) शासन नाबार्डला प्रस्तुत कर्जावर सध्या ५.२५ टक्के प्रतिशत प्रतिवर्ष या दराने व्याज अदा करेल. व्याजदराबाबत जे काही निदेश नाबार्डकडून वेळोवेळी प्राप्त होतील त्यानुसार शासन नाबार्डला व्याज अदा करेल. व्याज दर तिमाही कालावधीकरिता एकूण कर्जाच्या शिल्लक रकमेवर देण्यात येईल. कॅलेंडर वर्षाच्या प्रत्येक तिमाहीनंतरच्या महिन्यातील पहिल्या तारखेस व्याज देय राहील. जर व्याज थकीत राहिले तर थकीत दिनांकापासून त्यावर त्यावेळी अंमलात असलेल्या व्याजाच्या दराने व्याज देण्यात येईल.

(४) ज्या प्रकल्पांकरिता कर्ज मंजूर झाले आहे, अशा प्रकल्पांवर सन २०१६-१७ मध्ये दिनांक ०१/०४/२०१६ पासून आतापर्यन्त प्रत्यक्ष केलेल्या खर्चाचे प्रतिपूर्ती स्वरुपातील मागणी अर्ज/ दावे नाबार्डकडे सादर करण्यात येतील.

(५) कर्ज काढण्याच्या दिनांकापासून सुरुवातीची दोन वर्ष सवलतीचा कालावधी (ग्रेस पिरिएड) म्हणून समजण्यास नाबार्डने सवलत दिली आहे. या सवलतीच्या कालावधीमध्ये कर्जाची परतफेड न करण्याची मुभा नाबार्डने शासनास दिली आहे. हया सवलतीच्या कालावधीची सोय उपलब्ध करुन घेण्याचे शासनाने ठरविले आहे. त्यामुळे प्रत्येकवेळी काढण्यात येणारी कर्जाऊ रक्कम हे एक स्वतंत्र कर्ज राहील व कर्जाची परतफेड दोन वर्षाच्या सवलतीच्या कालावधीनंतर पाच वर्षामध्ये समान हप्त्यात करण्यात येईल.

(६) नाबार्डकडून प्राप्त होणा-या उपरोक्त कर्जाच्या समन्वयासाठी समन्वय अधिकारी, ग्रा.पा.वि.नि.प्रकल्प तथा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांची नियुक्ती करण्यात येत आहे. क्षेत्रीय स्तरावरील तसेच कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबंधी सर्व जबाबदारी समन्वय अधिकारी, ग्रा.पा. वि.नि.प्रकल्प तथा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांची राहील.

(७) या शासन निर्णयातील जलसंपदा विभागाच्या १० प्रकल्पांची कामे ३१ मार्च, २०२० पूर्वी पूर्ण करुन, त्याबाबत काम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र जलसंपदा विभागाने नाबार्डला ३० एप्रिल, २०२० पर्यंत सादर करणे बंधनकारक राहील.

**(ब)** नाबार्डकडून मिळणा-या उपरोक्त कर्जाबाबत अनुसरावयाची अर्थसंकल्पीय लेखांकन पध्दती शासन निर्णय, क्रमांक-अर्थऊ-१०९७/प्र.क्र.३४/अर्थबळ, दिनांक २७/०३/१९९८ च्या जोडपत्रात दर्शविल्याप्रमाणे राहील.

**(क)** (१) नाबार्डकडून आरआयडीएफ- XXII खाली जलसंपदा विभागाच्या प्रकल्पाकरिता मिळणा-या कर्जाच्या बाबतीत "नोडल ऑफीसर" म्हणून सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांची नियुक्ती करण्यात येत आहे. शासन निर्णय, क्रमांक-अर्थऊ-१०९५/ प्र.क्र.८४/अर्थबळ, दिनांक १२/०२/१९९६ मध्ये पृ.क्र.४ वर "(क)" पुढे नमूद केल्याप्रमाणेच नोडल ऑफीसरच्या जबाबदा-या व कर्तव्य राहतील.

(२) प्रस्तुत प्रकरणी परिचालन अग्रीम घेण्याकरिता शासन अनुमती असून, याबाबत समन्वय अधिकारी तथा सह संचालक, ले. व को. पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही प्राधान्याने करावी.

(३) कर्जाची परतफेड करणे व कर्जावरील व्याज प्रदान करणे याकरिता लागणाऱ्या रकमा संबंधित लेखाशिर्षाखालील तरतूदीतून काढण्याचे अधिकार सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत. रकमा काढण्याच्या मंजूरी आदेशावर सही करण्याचे अधिकार "नोडल ऑफीसर" तथा सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे यांना अथवा ते ज्या अधिका-यास प्रदान करतील त्या अधिका-यास प्रदान करण्यात येत आहेत. नोडल ऑफीसरकरिता विहीत केलेली कार्ये योग्यप्रकारे केली जात आहेत, यावर संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई हे देखरेख ठेवतील.

**(ड)** सदर शासन निर्णय जलसंपदा विभागाच्या सहमतीने काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०२१६१६३७१६६७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Narayan Gangurde

Digitally signed by Subhash Narayan Gangurde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bccb7fb4f0c7cbcfe1afc1a1ea8ccd4998 1e3a99eef6ca123744c0bceaa80a4, cn=Subhash Narayan Gangurde
Date: 2017.02.20 12:21:23 +05'30'

**( सुभाष गांगुर्डे )**
**कक्ष अधिकारी, वित्त विभाग**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
६) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
९) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
१०) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.
११) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-०४.
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल,ग्लोव मिल पॅलेस, वरळी -४०० ०१३.
१३) इंडियन नॅशनल कॉग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
१४) नॅशनॅलिस्ट कॉग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई- २१.
१५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८) अ.मु.स /प्रधान सचिव, नियोजन विभाग /जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-४०० ०२१,
२०) सह संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई-०३२,
२१) सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे विभाग, पुणे.
२२) डेप्युटी जनरल मॅनेजर, राष्ट्रीय कृषि आणि ग्रामीण विकास बँक (नाबार्ड),५४ वेलस्ली रोड, पोस्ट बॅग नं.५, शिवाजी नगर, पुणे-११,
२३) समन्वय अधिकारी, ग्रामीण पायाभूत विकास निधी प्रकल्प तथा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स, नागपूर.

२४) कोषागार अधिकारी, पुणे, जालना, सांगली, नांदेड, ठाणे, औरंगाबाद, सातारा, चंद्रपूर, सोलापूर, अमरावती, वर्धा, लातूर,वाशिम.

२५) कक्ष अधिकारी, (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२५) कार्यासन व्यय-१२, अर्थसंकल्प-१, अर्थसंकल्प-१०, प्रशासन-४, ऋण व हमी नियंत्रण कक्ष, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२६) निवड नस्ती, कार्यासन अर्थबळ.

**********************